**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : गौखनि ३९/१०१५/प्र.क्र.५२२/ख

महसूल व वन विभाग
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २०१९

**<u>विषय : गौण खनिज-औरंगाबाद</u>**
मौजे वांजरगांव, ता. वैजापूर, जि. औरंगाबाद या वाळूगटातून उत्खनन न करता आलेल्या वाळूची रक्कम परत करणेबाबत.
- श्री. अहिलाजी दामोदर डमाळे.

**<u>शासन ज्ञापन:</u>**

जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांना उपरोक्त विषयाबाबतचे पत्र क्र. जा.क्र.२०१६/मशाका-२/गौख/कावि, दि.६/०२/२०१६ रोजीच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्याचे मला निदेश आहेत की, सन २०१३-१४ करीता मौजे वांजरगांव, ता. वैजापूर हा वाळूगट रक्कम रू.१,२१,११,१११/- एवढ्या सर्वोच्च बोलीने श्री. अहिलाजी दामोदर डमाळे यांना ७,०६७ ब्रास वाळूकरीता दि.२७/०१/२०१४ रोजी मंजूर करण्यात आला.

२. सदर वाळूगटातून मंजूरीपेक्षा जास्त उत्खनन होत असल्याबाबत प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने तसेच लिलावधारक यांचा खुलासा संयुक्तीक नसल्याने जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांनी सदर वाळूगट दि.१९/०५/२०१४ रोजीच्या आदेशान्वये रद्द केला. लिलावधारक यांनी जिल्हाधिकारी, औरंगाबाद यांच्या उक्त आदेशाविरूध्द अपर आयुक्त, औरंगाबाद यांच्याकडे अपील दाखल केले असता अपर आयुक्त, औरंगाबाद यांनी दि.३०/०६/२०१४ च्या आदेशान्वये जिल्हाधिकारी, औरंगाबाद याचे दि.१९/०५/२०१४ चे दंडाचे आदेश रद्द केले.

३. तद्नंतर लिलावधारकाने सदर वाळूगटातील उर्वरीत वाळूचे उत्खनन करण्याची परवानगी अथवा प्रमाणशीर रक्कम परत करण्याची विनंती मा. मंत्री (महसूल) यांचेकडे अपील अर्जाद्वारे केली. सदर अपील अर्जावर मा. मंत्री (महसूल) यांनी दि.१६/०५/२०१८ रोजी प्रमाणशीर रक्कम परिगणीत करून प्रशासकीय प्रस्ताव सादर करणेबाबतचे आदेश पारीत केले. सदर आदेशाच्या अनुषंगाने लिलावधारक यांना उक्त वाळू गटातून उत्खनन न करता आलेल्या वाळूच्या प्रमाणशीर रक्कमेमधून, लिलावधारकाने लिलावाच्या रक्कमा विहित वेळेत शासनजमा न केल्याने लिलावाची १/४ रक्कम जप्त करून उर्वरीत रक्कम रू.७६,१८,०३८/- परत करणेबाबतचा शासनाने निर्णय घेतला आहे.

४. सबब, श्री. डमाळे यांना रक्कम रु. ७६,१८,०३८/- (रुपये शहात्तर लाख अठरा हजार अडतीस फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची संपूर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची, यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

५.    या बाबीवर होणारा खर्च सन २०१९-२० या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

६.    सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१०३११६४९५४९२१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

GAJANAN DHARMA DABHILKAR

Digitally signed by GAJANAN DHARMA DABHILKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f6398a3105d0cebbc1a00f25241de3304637656082108e1227c13033d76bfe, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=69c2bd0a657d8ab9b87341301d9ac56408774af7b6416010e1d362583c71ffd6, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=GAJANAN DHARMA DABHILKAR
Date: 2019.11.05 12:01:23 +05'30'

**(गजानन दाभिळकर)**
**कार्यासन अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

जिल्हाधिकारी औरंगाबाद, औरंगाबाद.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार औरंगाबाद, औरंगाबाद.
५) वित्त विभाग, (व्यय-९,अर्थसंकल्प -३, ६ व १४ कार्यासने) हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.
७) निवडनस्ती ख कार्यासन, महसूल व वन विभाग, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई -३२.